**दिनांक १ जानेवारी ते दिनांक १५ जानेवारी, २०२०**
**या कालावधीत मराठी भाषा संवर्धन पंधरवडा**
**साजरा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः मभापं-२०१९/प्र.क्र. ९३/भाषा-२**

८ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ०३ डिसेंबर, २०१९

**वाचा :-**

मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक-मभापं-२०१५/प्र.क्र.७०/भाषा-२, दि.२२ जुलै, २०१५

**शासन परिपत्रक:-**

मराठी भाषेचे वैभव जपण्यासाठी व भाषेच्या संवर्धनासाठी राज्यभर दिनांक १ जानेवारी ते १५ जानेवारी हा कालावधी प्रतिवर्षी "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा" म्हणून साजरा करण्याचा निर्णय संदर्भाधीन दिनांक २२ जुलै,२०१५ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्या अनुषंगाने राज्यातील सर्व शासकीय / निमशासकीय कार्यालये / महामंडळे, राज्यातील केंद्र शासनाच्या अखत्यारीतील सर्व कार्यालये / मंडळे / सार्वजनिक उपक्रम, सर्व खाजगी व व्यापारी बँका, सर्व शैक्षणिक संस्था / विद्यापीठे / महाविद्यालये इत्यादी सर्व संस्थांना दिनांक १ जानेवारी, २०२० ते १५ जानेवारी, २०२० या कालावधीत "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा" साजरा करण्याबाबत सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केल्यापैकी सुयोग्य अशा कार्यक्रमांचे आयोजन करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

राज्यामध्ये मराठी भाषेचा राजभाषा म्हणून सार्वत्रिक वापर करण्याच्या दृष्टीने सर्व कार्यालय प्रमुखांनी भाषा पंधरवड्यात विविध नाविन्यपूर्ण उपक्रमांचे आयोजन करावे व त्यामध्ये जास्तीत जास्त व्यक्तींचा सक्रीय सहभाग असावा. "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा" असे फलक सर्व कार्यालयांनी लावावेत.

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ नुसार वर्जित प्रयोजने वगळता शासकीय कामकाज १०० % मराठी भाषेतून करणे आवश्यक आहे. तर, त्रिभाषा सूत्रानुसार राज्यातील केंद्र शासनाच्या अखत्यारितील सर्व कार्यालये/मंडळे/सार्वजनिक उपक्रम यांनी मराठीचा वापर करणे अनिवार्य आहे. तरी याप्रमाणे योग्य कार्यवाही होत आहे काय याबाबत पंधरवड्याच्या निमित्ताने सर्व कार्यालय प्रमुखांनी आढावा घ्यावा.

सर्व मंत्रालयीन विभागांनी आपले कार्यालय व विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यालयांना "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा" साजरा करण्याबाबत दि.१०.१२.२०१९ पूर्वी आदेश द्यावेत व त्याची प्रत मराठी भाषा विभागास अग्रेषित करावी.

या कार्यक्रमासाठी येणारा खर्च संबंधित विभागांनी/कार्यालयांनी चालू वित्तीय वर्षात कार्यालयीन खर्चासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागवावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१२०३१२४८२९१६३३ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nanda Maruti Raut

Digitally signed by Nanda Maruti Raut
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Bhasha Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, serialNumber=baf9d9317025580944685e047b9c52d64c532684054f19e1f02c374b78e1773f, cn=Nanda Maruti Raut
Date: 2019.12.03 12:52:29 +05'30'

**( नंदा राऊत )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

४) मा.मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,

५) विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई (पत्राने)

६) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य/मराठी भाषा समिती सदस्य, विधानमंडळ, मुंबई (पत्राने)

७) सर्व विभागीय आयुक्त

८) सर्व जिल्हाधिकारी

९) कुलगुरु, सर्व विद्यापीठे

१०) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

११)शिक्षण संचालक (प्राथमिक /माध्यमिक/उच्च माध्यमिक/प्रौढ शिक्षण व अल्पसंख्यांक), महाराष्ट्र राज्य, पुणे,

१२) संचालक (उच्च शिक्षण, तंत्र शिक्षण, व्यवसाय शिक्षण, ग्रंथालये ), महाराष्ट्र राज्य, पुणे,

१३) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई (पत्राने),

१४) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने),

१५) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.

१६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानसभा, विधानभवन, मुंबई.

१७) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

१८) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),

१९) महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,

२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

२२) भाषा संचालक, भाषा संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई,

२३) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,

२४) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,

२५) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,

२६) सर्व विभागीय सहायक भाषा संचालक, पुणे / नागपूर / औरंगाबाद / नवी मुंबई,

२७) कार्यकारी अधिकारी,आकाशवाणी केंद्र,एच.टी.पारेख मार्ग,आमदार निवास समोर, चर्चगेट, मुंबई-४०००२० (पत्राने)

२८) कार्यकारी अधिकारी, दुरदर्शन केंद्र वरळी,पांडुरंग बुधकर मार्ग, बी.डी.डी.चाळ, वरळी, मुंबई (पत्राने)

२९) सर्व केंद्रीय कार्यालयांची मुख्यालये /बँका, विमा कंपन्या व सार्वजनिक उपक्रम यांची मुख्यालये/ रेल्वे/विमान वाहतूक यांची मुख्यालये (स्वतंत्र पत्राद्वारे)

३०) सर्व मंत्रालयीन विभाग

३१) निवडनस्ती (भाषा-२).

## परिशिष्ट "अ"

१) मराठी भाषेसंबंधी, वाङ्.मयासंबंधी विविध परिसंवाद /व्याख्याने / कार्यशाळा / शिबिरे / कवी संमेलन/ एकांकिका/ बालनाट्ये/ नाटके/ पुस्तक प्रकाशन समारंभ/साहित्य पुरस्कार वितरण यांचे आयोजन

२) स्पर्धा-मराठी भाषेत निबंध/ प्रश्नमंजुषा/ कथा कथन/ चारोळी लेखन/ कथा लेखन/ कविता लेखन/हस्ताक्षर/ शुद्धलेखन/वक्तृत्व/घोषवाक्ये/अभिवाचन/वादविवाद/ अंताक्षरी/ काव्यशास्त्र विनोद

३) मराठी वाचन संस्कृती वाढावी यादृष्टीने मराठी भाषेतील तज्ज्ञ व्यक्ती/लेखक/वक्ते यांच्याकडून मार्गदर्शन तसेच नामवंत लेखकांना बोलावून "संवाद लेखकांशी" अशा स्वरूपाच्या कार्यक्रमांचे आयोजन

४) ग्रंथ प्रदर्शन, ग्रंथदिंडी, कथाकथन, काव्य वाचन, माहितीपट इत्यादी साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन

५) वेगवेगळ्या क्षेत्रात यशस्वी असणा-या मराठी भाषिक व्यक्तींचा सत्कार, मुलाखती यांचे आयोजन

६) राज्यातील अमराठी भाषिकांना मराठी भाषेचा सुलभ पध्दतीने परिचय करुन देण्याच्या दृष्टीने कार्यशाळा/ भाषिक स्पर्धा इत्यादीचे आयोजन

७) मराठी भाषेच्या वापराबाबत जागरुकता निर्माण करण्याकरिता संबंधित कार्यालयांनी संकेतस्थळे, आकाशवाणी, दूरदर्शन, खाजगी दूरचित्रवाहिन्या, एफ.एम.रेडिओ, स्थानिक केबल नेटवर्क, फेसबुक, ट्विटर, व्हॉट्सॲप इ. अशा आधुनिक प्रसार माध्यमातून याबाबतचे दृक-श्राव्य संदेश प्रसारण

८) मराठी भाषेचा प्रचार, प्रसार व संवर्धन यासाठी विविध मार्गानी स्वयंप्रेरणेने काम करणा-या व्यक्ती/संस्था यांच्या कार्यास प्रोत्साहन देण्यासाठी त्यांच्या कार्याचा गौरव/सत्कार

९) मराठी विकिपिडियावर लेखन करण्याच्या प्रशिक्षण वर्गाचे आयोजन -

विकिपीडिया हा इंटरनेटवरील माहितीचा ज्ञानसागर असून तो जनमानसात रुजला आहे. आजमितीला २८८ भाषांमध्ये एकमेकांच्या सहकार्यातून हा मुक्त ज्ञानकोशाचा प्रकल्प विकसित होत आहे. कोणतीही माहिती आवश्यक असली की हल्ली आपण लगेच इंटरनेटवर त्या माहितीचा शोध घेतो. परंतु, इंटरनेटवरील विशाल अशा या ज्ञानसागरात अन्य भाषांच्या तुलनेत मराठी विकिपीडियावर खुपच कमी प्रमाणात माहिती उपलब्ध आहे. यासाठी आपण मराठी विकिपिडीयावर आपले खाते उघडून आपल्याला माहित असलेली आपल्या गावाबद्दलची माहिती, लेख, कविता इत्यादी लिखाण करु शकतो. आपले हे लिखाण विकिपिडीयावर जगभरातील व्यक्ती पाहू शकतील. विकीपिडीयावर लिखाण करण्यामुळे आपली मायबोली सर्वदूर पोहोचेल. राज्यातील खेडोपाड्यातील विद्यार्थी/नागरीक यांनी जरी विकिपिडीयावर माहिती शोधली तरी त्यांना ती मराठीतून उपलब्ध होईल आणि महाराष्ट्राच्या प्रगतीला हातभार लागेल.

विकिपिडियाचे प्रशिक्षण आयोजित करण्यासाठी संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, email - rmvs_mumbai@yahoo.com दू.क्र.२२६३१३२५, श्री.सुबोध कुलकर्णी, सेंटर फॉर इंटरनेट ॲण्ड सोसायटी email-subodhkiran@gmail.com भ्रमणध्वनी क्र. ९४२२९०७३३० यांच्याशी संपर्क साधावा.

*************